**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतन बाबीकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील माहे ऑगस्ट, २०१९ ते नोव्हेंबर, २०१९ या चार महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-राअआ-२०१९/प्र.क्र.५८/का-९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १३ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा :-**

(१) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१/का-०४/ २०१९-२० दि.१६/१०/२०१९ चे पत्र व सहपत्रे.

(२) शासन निर्णय अविवि क्र. राअआ-२०१९/प्र.क्र.५८/का-९ दि.०२ मे, २०१९

(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१९/प्र.क्र.९९/अर्थ-३,दि.०८ जुलै,२०१९.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१९ ते जुलै, २०१९ या चार महिन्यांचा वेतनावरील खर्च भागविण्याकरीता संदर्भ क्र.२ दि.०२ मे, २०१९ च्या शासन निर्णयान्वये रु.३०,१०, ०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. आता माहे ऑगस्ट, २०१९ ते नोव्हेंबर,२०१९ या चार महिन्याचा वेतनावरील खर्च भागविण्याकरीता मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०१९-२०या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.९०,३०,०००/- (अक्षरी रूपये नव्वद लक्ष तीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र. (३) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक ०८.०७.२०१९ नुसार एप्रिल, २०१९ ते डिसेंबर, २०१९ या नऊ महिन्यांकरीता एकुण अर्थसंकल्पित निधीच्या ६० टक्के च्या प्रमाणात निधी वितरणास मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार रु.५४,१८,०००/- एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यापैकी शासन निर्णय दि. ०२ मे, २०१९ अन्वये रु.३०,१०,०००/- एवढा निधी आयोगास वेतनावरील खर्चासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सद्यस्थितीत उक्त लेखाशिर्षाखाली रु. २४,०८, ०००/- एवढा निधी शिल्लक आहे. सदर शिल्लक निधीतून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनावरील खर्चाकरीता माहे ऑगस्ट,२०१९ ते नोव्हेंबर, २०१९ पर्यंत मासिक अनुदान प्रति माह रु.६,०२,०००/- (अक्षरी रुपये सहा लक्ष दोन हजार फक्त) प्रमाणे (६,०२,०००X४=२४,०८,०००) रु.२४,०८,०००/- (अक्षरी रुपये चौवीस लक्ष आठ हजार फक्त) एवढे वेतन अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या वेतनाच्या बाबीकरीता त्यांनी मागणी केल्याप्रमाणे माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे नोव्हेंबर, २०१९ या चार महिन्याकरीता **(रु.६,०२,००० X ४ = रु.२४,०८,०००) एकूण रु.२४,०८,००० (अक्षरी रूपये चौवीस लक्ष आठ हजार फक्त )** इतके अनुदान, ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली खालील दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०१९-२० साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.) | चारमाही साठी शासन निर्णय दि.०२ मे, २०१९ अन्वये वितरित अनुदान ( माहे एप्रिल, २०१९ ते जुलै, २०१९) (रु.) | माहे ऑगस्ट २०१९ ते नोव्हेंबर २०१९ करिता मंजूर अनुदान (प्रतिमाह ) (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ३६,सहायक अनुदाने (वेतन) | ९०,३०,०००/- | ३०,१०,०००/- | ६,०२,००० X ४ = रु.२४,०८,०००/- |
| | **एकूण** | **९०,३०,०००/-** | **३०,१०,०००/-** | **रु.२४,०८,०००/-** |
| | | | | **( अक्षरी रुपये चौवीस लक्ष आठ हजार फक्त )** |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१९-२० च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाच्या खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी.

या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनांस सादर करणे तसेच संदर्भा क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी “मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

६. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-

२०१९/प्र.क्र.९९/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९ मधील अटींची व सोबतच्या परिशिष्ठामधील मार्गदर्शक सुचनांची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११४११४६१८४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2019.11.14 11:48:43 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).